अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील जिल्हा पुरवठा अधिकारी, गट-अ (राजपत्रित) संवर्गात तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : आस्थाप्र -२०१९/प्र.क्र.२९५/ना.पु.-१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट, २०२०.

**शासन आदेश**

सन २०१९-२० या निवडसूची वर्षात अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील खालील तांत्रिक अधिकारी, गट ब वेतनश्रेणी S-१६- (रू. ४४९००-१४२४००) यांना जिल्हा पुरवठा अधिकारी, गट अ राजपत्रित - वेतनश्रेणी S-२०- (रू. ५६१००-१७७५००) या संवर्गात या आदेशाद्वारे विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदर तांत्रिक अधिकारी यांची त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री. सुधाकर भिमराव पवार | तांत्रिक अधिकारी, अमरावती | जिल्हा पुरवठा अधिकारी, यवतमाळ |
| २ | श्री. मनोहर हिरालाल कडवे | तांत्रिक अधिकारी, कोकण | उप नियंत्रक, "अ" परिमंडळ |

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय विधी व न्याय विभागाने दि.२८.१२.२०१७ रोजी दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत तसेच अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सा.प्र.वि. / का.१६-ब ने दि.२९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत. त्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून तसेच पुढील अटीच्या अधीन राहून संबंधित तांत्रिक अधिकारी यांना जिल्हा पुरवठा अधिकारी, गट-अ या पदावर **खुल्या प्रवर्गातील** रिक्त पदावर **निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात** पदोन्नती देण्यात येत आहे:-

१) सदर मान्यता सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी/सहायक अन्नधान्य वितरण अधिकारी/ तांत्रिक अधिकारी, गट-ब या संवर्गाच्या दि. ०१/०१/२०२० ची स्थिती दर्शविणाऱ्या अंतिम ज्येष्ठता सूचीनुसार देण्यात आली आहे.

२) सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपात असून सदर पदावर संबंधीत अधिकाऱ्यांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही.

३) सन २०१९-२० या निवडसूची वर्षाकरीता पात्र तांत्रिक अधिकारी यांची निवडसूची तात्पुरत्या स्वरूपाची असून जिल्हा पुरवठा अधिकारी पदावरील पदोन्नत्या या तात्पुरत्या स्वरूपाच्या आहेत. परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) संबंधित तांत्रिक अधिकारी यांनी जिल्हा पुरवठा अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/०९/२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०१९-२० च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत जिल्हा पुरवठा अधिकारी पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

५) सदर अधिकाऱ्यांची जिल्हा पुरवठा अधिकारी पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६) सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून उक्त अधिकाऱ्यांना पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू होण्यासाठी ते धारण करीत असलेल्या पदावरून या आदेशान्वये (म.नं.) एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

७) सदर अधिकारी त्यांना अनुज्ञेय असलेल्या रुजू कालावधीत बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन १४, दिनांक २३ डिसेंबर २०१६ मधील तरतुदींनुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

८) सदर तात्पुरत्या पदोन्नतीच्या अनुषंगाने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होईपर्यंत शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये.

९) आहरण व संवितरण अधिकारी/ अधिदान व लेखाधिकारी यांना कळविण्यात येते की, उपरोक्त अधिकाऱ्यांचे त्यांच्या कार्यमुक्तीच्या दिनांकापासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत पूर्वीच्या नियुक्ती ठिकाणाहून अदा करण्यात येऊ नये अन्यथा त्यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

१०) संबंधित जिल्हाधिकारी / नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करून उक्त नमूद अधिकाऱ्यांना पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू करून घ्यावे व अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

११) सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१०१६०८५२३८०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Asmita Ravindra Patil

Digitally signed by Asmita Ravindra Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supply Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3aae158692ef65b4486d9f1ec9f35e5a368c85b29b6c959f9fc2c7c0e59d944c, serialNumber=8e2cf7f99a7e33f6152bff0b34255dd63550b37c8fbbb9a98cee4ecd4336f598, cn=Asmita Ravindra Patil
Date: 2020.08.10 17:48:22 +05'30'

**( अस्मिता पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) श्री .सुधाकर भिमराव पवार, तांत्रिक अधिकारी, अमरावती विभाग.

२) श्री .मनोहर हिरालाल कडवे, तांत्रिक अधिकारी, कोकण विभाग.

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, अमरावती / कोकण.

२) उपायुक्त ( पुरवठा ), अमरावती / कोकण.

३) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.

४) महालेखापाल-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), मुंबई व नागपूर.

५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

६) जिल्हाधिकारी, यवतमाळ.

७) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.

८) खाजगी सचिव, मा. मंत्री ( अनापु व ग्रासं ) यांचे कार्यालय.

९) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री ( अनापु व ग्रासं ) यांचे कार्यालय.

१०) सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे स्वीय्य सहाय्यक.

११) निवडनस्ती/ना.पु.-१५.